**माहितीचा अधिकार अधिनियम, २००५ ची प्रभावी अंमलबजावणी करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : रामाआ-२०२१/प्र.क्र.६८७/आस्था-७**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक :- १० डिसेंबर, २०२१

संदर्भ :- रामाआ-अपील क्र. २२९०,२२९१,२२९२,२२९३,२२९४,२२९५,२२९६,२२९७,२२९९,२३०१/ २०१७/३८७२/२०२०,दि. १३.०८.२०२१

**प्रस्तावना :-**

मा. राज्य माहिती आयुक्त, अमरावती यांनी संदर्भाधीन आदेशानुसार माहिती अधिकारी अधिनियम, २००५ च्या कलम १९ (८)(क) व २५ (५) नुसार असे आदेशित केले आहे की, जिल्हा परिषदेचे प्रशासन हे सामान्य प्रशासन विभागाचे स्थायी आदेशांचे उल्लंघन तर करतातच परंतु, आयोगाचे आदेशाचे देखिल विहीत मुदतीत अनुपालन करित नाहीत. तसेच मुख्य कार्यकारी अधिकारी सारखे जबाबदार अधिकाऱ्यांकडून शपथपत्र सादर करुन सुध्दा तशी कार्यवाही होत नाही किंवा झाली तरी ती विपरीत होते. त्यामुळे माहितीचा अधिकार अधिनियम, २००५ या कायद्याची प्रभावी अंमलबजावणी व त्यासंबंधी अपिलार्थीचा उद्देश सफल होत नाही. यामुळे शासनाने याची तात्काळ गंभीर दखल घेवून या आदेशाची अंमलबजावणी व भविष्यात याबाबत अशी पुनरावृत्ती सार्वजनिक प्राधिकरणाकडून होणार नाही याबाबत आवश्यक ते परिपत्रक निर्गमित करुन अनुपालन अहवाल आयोगास सादर करावा असे मा. राज्य माहिती आयुक्त, अमरावती यांनी आदेश दिले आहेत.

**शासन परिपत्रक :-**

माहितीचा अधिकार अधिनियम, २००५ या कायद्याची प्रभावी अंमलबाजवणी होणेसाठी वेळोवेळी सूचना दिलेल्या आहेत. तरी सुध्दा सदर कायद्याची प्रभावी अंमलबजाणी होत नाही. तसेच राज्य माहिती आयोगाकडे झालेल्या सुनावणीच्या आदेशाचे विहित मुदतीत अनुपालन होत नसल्याचे संदर्भाधीन आदेशानुसार निदर्शनास आले आहे.

२. माहितीचा अधिकार अधिनियम, २००५ अंतर्गत प्राप्त होणारे अर्ज/अपिल यावर जन माहिती अधिकारी/अपिलीय अधिकारी यांनी सदर अधिनियमातील तरतूदी नुसार विहित मुदतीमध्ये कार्यवाही करावी. त्याच बरोबर राज्य माहिती आयोगाकडून प्राप्त झालेल्या आदेशांवर विनाविलंब कार्यवाही करण्यात यावी. असे पुन्हा स्पष्ट करण्यात येत आहे.

३. सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२११२१०१०३९४१५३२० असा आहे. सदरचे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने प्रसिध्द करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KALU GONYA VALVI

Digitally signed by KALU GONYA VALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=714701fc3db9c38a46f4cd82e1e450b51a9e92eede8c323934f82edb538d3b20, pseudonym=C66B420751C8769D652257224AF3DC28B2BA4FF1, serialNumber=8C5D0F275C3D9A21DB07FECF7919C2D83796E88930D62D44E7A4A6D4CBEE7E0E, cn=KALU GONYA VALVI
Date: 2021.12.10 14:46:06 +05'30'

**( का.गो.वळवी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, मलबार हिल, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
४. मा. राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
६. मा. अपर मुख्य सचिव, ग्राम विकास विभाग, बाधंकाम भवन, फोर्ट, मुंबई-०१
७. राज्य माहिती आयोग, नविन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर, मुंबई-३२
८. राज्य माहिती आयोग, औरंगाबाद, नागपूर, अमरावती खंडपीठ
९. विभागीय आयुक्त, कोकण, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर
१०. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
११. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,यवतमाळ
१२. निवड नस्ती आस्था-७, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.